**शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी या कार्यालयाच्या इमारतीच्या अंतर्गत दुरुस्ती, नुतनीकरण, सुशोभीकरण व आधुनिकीकरण करणे यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक- पुरक-२०२१/प्र.क्र.१५४/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ फ़ेब्रुवारी, २०२२.

**वाचा** : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. बैठक-२०२०/प्र.क्र.८०/२०२०/साशि-५, दि.०७.१०.२०२१.
२) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३४/पु.मा./२०२१-२२/७३१३-१४, दि.१०.११.२०२१.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थ-३, दि.०३.०१.२०२२.

**ज्ञापन :**

लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या स्मृती शताब्दी उपक्रमांतर्गत शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी या कार्यालयाच्या इमारतीच्या अंतर्गत दुरुस्ती, नुतनीकरण, सुशोभिकरण व आधुनिकीकरण करणे या कामासाठी शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग दि.०७.१०.२०२१ अन्वये रु. ४,२५,००,६२६/-( अक्षरी रुपये चार कोटी पंचवीस लाख सहाशे सव्वीस फ़क्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामासाठी विधीनमंडळाच्या डिसेंबर,२०२१ च्या अधिवेशनामध्ये आस्थापना खर्चासह रु.१,००,००,०००/- ( अक्षरी रुपये एक कोटी फ़क्त ) ची पुरक मागणी मंजूर करण्यात आली आहे.

२. यानुषंगाने शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी या कार्यालयाच्या इमारतीच्या अंतर्गत दुरुस्ती, नुतनीकरण, सुशोभिकरण व आधुनिकीकरण करणे या कामासाठी पुरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रकमेतील आस्थापना खर्च वगळून रु.८६,९६,०००/- ( अक्षरी रुपये श्याऐंशी लाख श्याहान्नव हजार फ़क्त ) इतका निधी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. अटी व शर्ती :-

१) सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन सदर निधी वितरीत करावा. निधी वितरणाबाबत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या परिपत्रकांतील सूचनांचे पालन करावे.

२) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखांकडे सादर करावा.

३) सदरहू बांधकामावर होणारा खर्च मागणी क्र. एच-८, ४२०२, शिक्षण,क्रीडा,कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च ०४, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (००)(००)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२०२ ०४८२) ५३-मोठी बांधकामे या लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात पुरक मागणीद्वारे मंजूर निधीतून करण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१०/१४७१, दि.१०.०१.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९४/२०२२/व्यय-५,दि.२८.०१.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०२१५१२२०५५०७०८ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIL VITHALRAO SAWARE

Digitally signed by ANIL VITHALRAO SAWARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72cb8a88eb62e9fce4658097f358551a97efd8830073095 7d6401f7779015bcf, pseudonym=06CCFF3ECB0B3FFBAB55D9A0981C8214C023AFF2, serialNumber=1C7875BFBCCDB94828A5028954F06ED28EC75FD4 3053DB3AE8254FA5A5D14A57, cn=ANIL VITHALRAO SAWARE
Date: 2022.02.15 12:22:58 +05'30'

**( अनिल वि. सावरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. ग्रंथपाल, शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी ( ग्रंथालय संचालनालयामार्फ़त )
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
(ग्रंथालय संचालनालयामार्फ़त )
५. कक्ष अधिकारी ( अर्थ-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अ.मु.स. ( वित्त/नियोजन विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
१०. निवडनस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.